करी. शेवटीं कंटाळून त्यानें तिला एका मठांत राहावयास पाठवून दिलें. तेथें तर ती मोकळी होऊन अधिकच कारस्थानें करूं लागली. चिरंजीव अलेक्झी हेही त्याच्याविरुद्ध लावालावी करीत. सुधारणेस विन्मुख असलेल्या मठवाल्यांनीं आणि पुराणमतवाल्यांनीं या घरभेदाचा फायदा चटकन् घेतला आणि या मायलेकांच्या पुरस्कारानें पीटरच्या सुधारणाविषयक चळवळीस विरोध सुरू केला. पण अलेक्झी येवढया-वरच थांबला नाहीं. तो बापापासून पळून परदेशीं शत्रूंच्या आश्रयास गेला व तेथून जमवाजमव करून पीटरला सतावण्यासारख्या बाता बोलूं लागला. पीटर त्याच्या बारशाला खरोखरीच जेवला होता. तो जात्याच महा तामसी, क्रूर आणि आडदांड असा होता. त्यांत मुलाची ही सुधारणाविध्वंसाची आणि आपल्या अंगावर उठण्याची प्रवृत्ति पाहून तो चवताळून गेला. अलेक्झीस त्यानें हिकमतीनें परत आणविलें आणि एकाद्या कैद्याप्रमाणें त्याच्यावर खटला भरून गादीवर आपला कसलाही वारसा नाहीं असें त्याजकडून कबूल करून घेतलें. पण तेवढयावर तृप्त न होतां त्यानें त्यास शेवटीं ठार मारविलें. या भयानक कृत्यानंतर, आपल्या मागें मुलगा नाहीं म्हणून रिकाम्या पडणाऱ्या गादीसाठीं पुन्हा मारामाऱ्या होऊं नयेत म्हणून त्यानें वारसाचा कायदाच बदलला व ठरविलें कीं, गादीवर बसावयास झारला मुलगाच पाहिजे किंवा असला तर त्यास गादी मिळालीच पाहिजे असें नसून तो गादीचा मालक ज्यास ठरवील त्यानें राजा व्हावें! असा हा कर्ता राजा केलेली गोष्ट जपावयास वाटेल तें आचारावयास न भिणारा असा होता.

या त्याच्या कर्तबगारीमुळें त्याच्या वैगुण्याकडे आपलें लक्ष इतकेंसें जात नाहीं. अपराध्यांना शिक्षा काय कराव्या किंवा करूं नयेत याचा कसलाही विवेक तो करीत नसे. कोठें बंडें उठलीं तर बंड-खोरांची कसलीही गय न करतां, त्यांचा बींमोड करून, तो त्यांस

इतकें हैराण करी कीं त्यांस 'त्राहि भगवन्' होत असे. नीतीविचारही त्याला अगदीं वात्रडा होता. रोजच्या रोज दारू ढोसून झिंगून पडण्यांत त्याला कांहींच विशेष वाटत नसे. एरवींही स्वभावानें उथळ, उतावळा, किंबहुना पोरकट असे. एखादें कांहीं चांगलें वर्तमान आलें तर मोठमोठ्यानें घसा फोडून भोंवतालच्या सर्व लोकांना तो तें सांगत असे. कोणच्याशा एका युद्धानंतर त्याला हवा होता तसा तह ठरल्याचें ऐकल्याबरोबर भर चवाठ्यावर तो प्रत्यक्ष नाचूं-उडूं लागला! राजधानींत नेहमीं आगी फार लागत. त्यांतूनच त्यानें एकदां करमणूक करून घेतली. एके दिवशीं आग लागल्याचीं शिंगें गांवभर उगीचच्या उगीच वाजवावीं म्हणून त्यानें बंबवाल्यांना सांगितलें. लगोलग बोभाटलेल्या ठिकाणीं लोकांच्या झुंडीच्याझुंडी लोटल्या; त्यांजकडे पाहून डोळे मिचकावून पीटर म्हणाला, आगबीग कांहीं नाहीं. तुमची थोडी गंमत केली!' पण खुद्द राजेसाहेब व प्रजा या सांस्कृतिक दृष्ट्या एकाच तोलाच्या असल्यामुळें असल्या गोष्टीचें कोणास कांहीं वाटत नसे. हें सर्व खरें असलें तरी त्याला कामाचा मात्र कंटाळा नसे.

रोज पहांटे पांच वाजतां उठून, सर्व विधि उरकून तो शिरस्तेदारास कामाला बोलवी. सात वाजतां अठरा कारखाने तपासावयास निघे. परत येऊन एक वाजेपर्यंत टपाल रवाना करी. मग जेवणखाण इत्यादि होई. जेवणांतही फारसा खादाडपणा नव्हता. उगाच शंभर-हजार वाढपे आणि आचारी तो मुदपाकखान्यांत बाळगीत नसे. कामें उरकणारा जबरदस्त असे. एक परराष्ट्रीय वकील लिहितो: "हा राजा म्हणजे रशियांत उभ्या असलेल्या एकाद्या उंच शिखरासारखा आहे. शहाणपणा, बारकाई, अवलोकन, विचारांचा स्पष्टपणा आणि मनाची बळकटी या गुणांत याला तोड नाहीं." खरोखर सध्यांच्या रशियन जीवितावें असें एकही अंग नाहीं कीं, ज्यावर पीटरच्या हाताचा ठसा उमटलेला नाहीं. त्याच्या कल्पनेला विधायकपणा व हाताला यश

# कांहीं मतें



प्रो० **दत्तो वामन पोतदार—**

'पुरुषश्रेष्ठ' ग्रंथांत गोविलेलीं सुंदर चरित्रें मुलांस फार उद्बोधक होतील. रा० माटे यांची लेखनशैली फार मनोहर व मार्मिक अशी आहे. चरित्रें आटोपशीर, प्रतिपादन स्पष्ट व ठसकेदार आणि भाषा खुबीदार, क्वचित् खोंचदार असून स्पष्ट, प्रवाही व उल्हासयुक्त अशी आहे. त्यामुळें हा ग्रंथ मुलांच्या नित्यपाठांत घालण्यास अत्यंत पात्र असा उतरला आहे.

तारीख ४।७।३१

  

श्री० देशभक्त **नरसिंह चिंतामण केळकर—**

...आपली भाषा व विवेचनपद्धति यांची वेगळी प्रशंसा करण्याचें कारण नाहीं. पण दोन्ही येथें अशीं साधलीं आहेत कीं, प्रौढ व बाल अशा दोन्ही प्रकारच्या मनांला आपण लिहिलेलीं चरित्रें बोधप्रद होतील. मीं तीं वाचलीं तेव्हां त्यांत मला कांहीं नवी माहिती मिळाली व कांहीं जुन्या विस्मृत माहितीची उजळणी झाली. ग्रंथाचा हा पहिला भाग समजून असे आणखीही कांहीं भाग काढाल तर वाचकवर्ग ऋणी होईल.

तारीख २८।६।३१

  

श्री० देशभक्त **लक्ष्मण बळवंत भोपटकर—**

...पूर्वोक्त पुरुषश्रेष्ठांनीं पाश्चात्यांच्या, किंबहुना जगाच्या, इतिहासावर आपल्या उज्ज्वल चारित्र्याचा कायमचा ठसा उमटाविलेला आहे, इतकेंच नव्हे तर त्यास नवीन वळणेंही लाविलेलीं आहेत, यांत कांहीं शंका नाहीं. या नऊ श्रेष्ठ पुरुषांपैकीं प्रत्येकानें कोणकोणत्या क्षेत्रांत कोणकोणतें कार्य केलें, याची अचूक कल्पना रा० माटे यांनीं आपल्या ग्रंथांत वाचकांना करून दिलेली आहे. रा० माटे हे एक नामांकित आणि विशेषतः शुद्ध स्वरूपाची मराठी भाषा